# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
### शासन ज्ञापन क्रमांक-पोप्रमा-०६१७/प्र.क्र.३५०/पोल-७.

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.
दिनांक २ ऑगस्ट २०१७.

**विषय** :- पोलीस ठाणे, संगमेश्वर, तालुका-संगमेश्वर, जिल्हा-रत्नागिरी, याच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील माखजन दूरक्षेत्र याच्याकरिता प्रशासकीय इमारत व तेथील पोलीस कर्मचारी यांचेकरिता चार शासकीय निवासस्थाने यांचे बांधकाम करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**संदर्भ** :-
१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१४/ प्र.क्र.४९/ १४/ विनियम, दिनांक ०५.०१.२०१५.
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.
३) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांचे पत्र क्र. पोमसं/ २७-बी/ २८-बी-२/ माखजन-दूरक्षेत्र-प्रशा-इमा.-व-निवा-बांध.रत्नागिरी/ १५५/ २०१७, दिनांक ०३.०६.२०१७.

**ज्ञापन :-**

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांनी पोलीस ठाणे, संगमेश्वर, तालुका-संगमेश्वर, जिल्हा-रत्नागिरी, याच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील माखजन दूरक्षेत्र याच्याकरिता प्रशासकीय इमारत व तेथील पोलीस कर्मचारी यांचेकरिता चार शासकीय निवासस्थाने यांचे बांधकाम करण्याबाबतचा प्रस्ताव सादर केला आहे.

२. उक्त कामासाठी, उप-विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप-विभाग, देवरुख यांनी सन २०१५-१६ च्या जिल्हा दरसूचीनुसार रु.५९,३१,०००/- इतक्या खर्चाचे अंदाज तयार केले आहेत. उक्त खर्चाचे अंदाज हे कार्यकारी अभियंता, उत्तर रत्नागिरी (सार्वजनिक बांधकाम विभाग), रत्नागिरी, आणि पोलीस अधीक्षक, रत्नागिरी, यांनी साक्षांकित केले आहेत.

३. उक्त खर्चाचे अंदाज सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, यांनी तपासले आहेत व ते **रु.५५.१९ लक्ष** असे सुधारित केले आहेत व त्याप्रमाणे, पुढील अटींवर, प्रशासकीय मान्यता देण्यास सहमती दिली आहे:-

१) बांधकामाचा नमुना नकाशा, मांडणी नकाशा आणि विस्तृत नकाशा यांना वास्तुविशारदाकडून मंजूरी घेऊनच काम सुरु करावे.
२) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतुदींबाबत विस्तृत खर्चाचे अंदाज मंजूर करुनच काम हाती घ्यावे.
३) बांधकाम करताना शासन निर्णय, पर्यावरण विभाग, क्र. इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१, दिनांक १०.०१.२०१४ या अनुसार कार्यवाही करण्यात यावी.
४) निधी उपलब्ध झाल्याशिवाय काम सुरु करु नये.

५) उक्त कामासाठी निवीदा मागविण्यापूर्वी नियोजित जागा उपभोक्त विभागाच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र उपभोक्ता विभागाकडून प्राप्त करुन घ्यावे.

**४.** त्या अनुसार, पोलीस ठाणे, संगमेश्वर, तालुका-संगमेश्वर, जिल्हा-रत्नागिरी, याच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील माखजन दूरक्षेत्र याच्याकरिता प्रशासकीय इमारत व तेथील पोलीस कर्मचारी यांचेकरिता चार शासकीय निवासस्थाने यांचे बांधकाम करण्यास, परिच्छेद ३ मध्ये नमूद केलेल्या अटींवर, याद्वारे, मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

**५.** उक्त कामासाठी येणारा खर्च हा गृह विभाग-मागणी क्रमांक बी-१०, ४०७०, इतर प्रशासनिक सेवांवरील भांडवली खर्च, (००)(११) महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण पोलीस विभागाच्या कार्यालयीन इमारतीचे बांधकाम करणे (४०७० ०२११), ५३, मोठी बांधकामे, याखाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**६.** हे ज्ञापन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.५६७/इमा-२, दिनांक १०.०७.२०१७, अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

**७.** हे ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०८०२१५१८३९१६२९ असा आहे. हे ज्ञापन डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Gopal Borse

Digitally signed by Swapnil Gopal Borse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66835707253ff77ef0e333eb3ad582f9b876d443b2654088832e43dcad21c52a, cn=Swapnil Gopal Borse
Date: 2017.08.02 15:19:19 +05'30'

**(स्वप्नील गोपाल बोरसे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**
पोलीस महासंचालक,
महाराष्ट्र राज्य, मुंबई.

**प्रत :-**

१) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई.
३) विशेष पोलीस महानिरीक्षक, कोकण परिक्षेत्र, नवी मुंबई.
४) पोलीस अधीक्षक, रत्नागिरी.
५) कार्यकारी अभियंता, उत्तर रत्नागिरी (सार्वजनिक बांधकाम) विभाग, रत्नागिरी.
६) जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी.
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर.
८) निवड फाईल (पोल-७).